**राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता सन २०२३-२४ करिता पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध तरतूदीतून निधी वितरीत करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी७७२)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१०जी७८१)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.बीयुडी-१३२४/प्र.क्र.१३२/आरोग्य-३अ

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान योजनेसाठी अनुसूचित जाती योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१०-सार्वजनिक आरोग्य, ७८९-अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (२३) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी७७२, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.०.०१ लाख तसेच (०१) (२४) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी७८१, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.०.०१ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे. तसेच संदर्भाधीन क्र.३ येथील दि.३१.३.२०२४ च्या ज्ञापनान्वये केंद्र हिश्यासाठी रु.७९.६८ लाख व राज्य हिश्यासाठी रु.५३.१२ लाख इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४, रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाने संदर्भाधीन नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार (०१) (२३) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी७७२, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.७९.६८ लाख तसेच ०१) (२४) राष्ट्रीय कर्करोग, मधुमेह, हृदयरोग व पक्षघात प्रतिबंधक व नियंत्रण कार्यक्रम (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २२१०जी७८१, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.५३.१२ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण,

संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. सदर निधी PFMS प्रणालीमार्फत SNA खात्यामध्ये जमा करण्यात यावा व याची खातजमा विभागाने करावी. PFMS प्रणालीद्वारे राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने केंद्र शासनाने वेळोवेळी जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ व दि.४.३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ वि द.४.३.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.४५१/व्यय-१४, दि.३१.३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०३१६३८२९६८२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.04.03 16:47:46 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग